पुणे विभागातील संरक्षित स्मारकांचे नियंत्रित क्षेत्र यांचे फोटोग्रामेटिक आणि लिडार सर्वेक्षण योजना तयार करणे कामास आवश्यक वित्तीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२३/प्र.क्र.३२०/सां.का.३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४.

**वाचा :-** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.स्मारक २०२१/प्र.क्र.१९/सां.का.३, दिनांक २८.०९.२०२१

२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.स्मारक २०२३/प्र.क्र.३२०/सां.का.३, दिनांक २८.११.२०२४

३) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे जा.क्र. स्मारके/२०२४/१४१२, दिनांक २९.०३.२०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

पुणे विभागातील संरक्षित स्मारकांचे नियंत्रित क्षेत्र यांचे फोटोग्रामेटिक आणि लिडार सर्वेक्षण योजना तयार करणे कामाच्या रु.३,५६,७५,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार या कामाकरीता निविदा प्रक्रिया राबविण्यात आली त्यातील मे. Enercom Solution Pvt. Ltd., अहमदाबाद यांच्या न्यूनतम निविदेस मान्यता तसेच मार्च,२०२४ पर्यंत या कामासाठी खर्च होणे अपेक्षित असलेल्या रु.१,५०,००,०००/- इतक्या रकमेस संदर्भाधीन क्र.०२ च्या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. सदर स्मारकाचे काम प्रगतिपथावर असून रु.१,५६,२६,७८४/- इतक्या रकमेचे काम झाले आहे. या स्मारकाच्या जतन दुरूस्तीकरिता आवश्यक रु.६,२६,७८४/- इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देणेबाबत विनंती संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार पुणे विभागातील संरक्षित स्मारकांचे नियंत्रित क्षेत्र यांचे फोटोग्रामेटिक आणि लिडार सर्वेक्षण योजना तयार करणे कामाकरीता आवश्यक एकूण रू.६,२६,७८४/- इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुणे विभागातील संरक्षित स्मारकांचे नियंत्रित क्षेत्र यांचे फोटोग्रामेटिक आणि लिडार सर्वेक्षण योजना तयार करणे कामाकरिता आवश्यक रु.६,२६,७८४/- (अक्षरी रूपये सहा लक्ष सव्वीस हजार सातशे चौऱ्याऐंशी फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर

स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

०३. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३१४/२०२४, व्यय-१५, दि.३१.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी -२ पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृति (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्वाचे किल्ले आणि धार्मिक स्थळे यांची जपणूक व संरक्षण (कार्यक्रम), (२२०५ १३०२) २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३१२१४०५६४३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2024.03.31 21:50:32 +05'30'

**(सु. दि. पाष्टे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, पुणे.
महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य ,मुंबई.
महालेखापाल - २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य , नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३